पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश,अंबेजोगाई, जिल्हा बीड यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरणअधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : एमसीटी- ०१०२ / ६४ /सीआर- ८७ /परि-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक : ७ मे, २००२.

**वाचा :-** १) शासन अधिसूचना, गृह विभाग, क्र. एमसीटी०४९८/(२३-ब)/परि-५, दि. ११.०८.२०००.
२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, बीड यांचे पत्र क्र. ६३८४/२००१, दि. २०.१२.२००१.
३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) यांचे पत्र क्र. अे. १२२४/८०, दि. ९.१.२००२.

**शासन निर्णय :-** मोटार वाहन कायदा, १९८८ ( १९८८ चा ५९ ) च्या कलम १६५(२)च्या अधिकारानुसार शासन अधिसूचना, गृह विभाग, क्रमांक : एमसीटी ०४९८ /(२३-ब) / परि-५, दिनांक ११.०८.२०००, अन्वये अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश, अंबेजोगाई, जिल्हा बीड येथे मोटार अपघाताचे दावे चालविण्यासाठी एक सदस्यीय मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापण्यात आले आहे व अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश, बीड यांची या न्यायाधिकरणावर पदसिध्द सदस्य म्हणून नेमणुक केली आहे. आता या आदेशान्वये पदसिध्द सदस्य मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, अंबेजोगाई, जिल्हा बीड यांना या न्यायाधिकरणाचे कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम दिनांक ११.७.२००१ मधील अ.क्र. ३ वरील नियम कमांक २ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

विजय वागवे
( विजय वागवे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई (पत्रान्वये )
जिल्हा व सत्र न्यायाधिश,व पदसिध्द सदस्य मोटारअपघात दावा न्यायाधिकरण , बीड
अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश व पदसिध्द सदस्य , मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,
अंबेजोगाई, जिल्हा बीड
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र ~~१, मुंबई~~ नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
विधी व न्याय विभाग, कार्यासन १२/ कार्यासन ३.
वित्त विभाग ( विनियम / व्यय -८).
गृह विभाग, आस्था-४ ( सर्वांचे माहितीसाठी )
निवड नस्ती, परिवहन -५

GR-20020719122235000-0200